**एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत ग्राम बाल विकास केंद्रातील अति तीव्र कुपोषित (SAM) बालकांना एनर्जी डेन्स न्युट्रीशियस फुड (EDNF) चा पुरवठा करण्यास मान्यता देण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०२३/प्र.क्र.१३१/का.०५**

नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : - ५ जुलै,२०२४

**वाचा :-** १) महिला व बाल विकास विभाग शासन निर्णय क्र. एबावि-२०१६/प्र.क्र.४३/ (भाग १ब) का-५ दि. ११.८.२०१७
२) महिला व बाल विकास विभाग शासन निर्णय क्र. एबावि-२०१६/प्र.क्र.३३१/का-५ दि.२६.९.२०१७
३) महिला व बाल विकास विभाग शासन निर्णय क्र.एबावि-२०२३/प्र.क्र.१२८/का-५ दि. ३०.१०.२०२३
४) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांचे पत्र क्र. एबाविसेयो/का-२/आवपो/बावियो/२०२३-२४/५५२०,दि. ३१.१०.२०२३
५) महिला व बाल विकास विभाग शासन पत्र क्र. एबावि-२०२३/प्र.क्र.१३१/का-५, दि. १६.११.२०२३
६) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांचे पत्र क्र. एबाविसेयो/का-२/आवपो/EDNF/२०२३-२४/१२८६,दि. १४.३.२०२४
७) राज्यस्तरीय खरेदी समितीचे दि. १९.६.२०२४ रोजी पार पडलेल्या बैठकीचे इतिवृत्त

**प्रस्तावना -:**

राज्यातील आदिवासी क्षेत्रातील व बिगर आदिवासी क्षेत्रातील अति तीव्र कुपोषित बालकांच्या कुपोषणाच्या समस्येवर मात करुन त्यांना सर्वसाधारण श्रेणीमध्ये आणण्याकरीता संदर्भाधीन क्र.१ व २ येथील शासन निर्णयान्वये राज्यात ग्राम बाल विकास केंद्र (VCDC) ही योजना सुरु करण्यात आली आहे. तसेच सदर योजना नियमितपणे पुढे सुरु ठेवण्यास संदर्भाधीन क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे .

२. त्यानुषंगाने आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत अति तीव्र कमी कुपोषित (SAM) बालकांना एनर्जी डेन्स न्युट्रीशियस फुड (EDNF) चा पुरवठा करण्यासाठी शासन मान्यतेनुसार महसूली विभागनिहाय निविदा प्रकाशित केली होती. त्यानुसार एकात्मिक बाल विकास सेवा योजना आयुक्तालयाकडून राबविण्यात आलेल्या निविदा प्रक्रियेनुसार अतितीव्र कुपोषित बालकांना EDNF पुरवठा करण्याकरीता पात्र ठरलेल्या पुरवठादारांची नियुक्ती करण्यास शासन मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय -:**

एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत ग्राम बाल विकास केंद्रातील अति तीव्र कुपोषित बालकांच्या कुपोषणाच्या समस्येवर मात करुन त्यांना सर्वसाधारण श्रेणीमध्ये आणण्याकरीता त्यांना एनर्जी डेन्स न्युट्रीशियस फुड (EDNF) आहाराचा पुरवठा करण्याकरीता निविदेप्रक्रियेअंती सर्वात कमी प्राप्त L-१ दर प्रति सॅचेट दर रुपये २९.३५/- नुसार महसूली विभागनिहाय खालीलप्रमाणे पुरवठादार संस्थांना शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | निविदाधारकांचे नाव | कामकाज वाटप करावयाचे महासूली विभाग | प्रति सॅचेट दर रुपये |
|---|---|---|---|
| १. | मे.मारिया महिला बचत गट | अमरावती, छत्रपती संभाजीनगर | २९.३५/- |
| २. | मे.इंडो अलाईड प्रोटीन फुड प्रायव्हेट लिमिटेड | कोकण, नागपूर,पुणे | |
| ३. | मे.जस्ट किचन प्रायव्हेट लिमिटेड | नाशिक | |

२. वरीलप्रमाणे सर्व पुरवठादार संस्थांना खालील अटी व शर्ती तसेच निविदेतील अटी शर्तीनुसार EDNF आहाराचा पुरवठा ग्राम बाल विकास केंद्रांकरीता करणे बंधनकारक राहील:-

१) **EDNF आहाराचा पुरवठा** :- EDNF आहाराचा पुरवठा निविदेतील अटी शर्तीनुसार व विहीत कालावधीत करणे संबंधित पुरवठादार संस्था यांना बंधनकारक राहील .

२) **आहाराची गुणवत्ता**: निविदा अर्जात नमुद केलेल्या अटी शर्तीनुसार लाभार्थ्यांना द्यावयाच्या EDNF आहाराचा दर्जा व गुणवत्ता असणे आवश्यक आहे. आहाराचा दर्जा व गुणवत्ता व इतर अनुषंगिक बाबीं निविदेतील अटी शर्तीनुसार नसल्यास संबधित पुरवठादार संस्था यांचेवर कार्यवाही करण्यात येईल.

३) EDNF आहार नमुन्याची मान्यताप्राप्त लॅब मधून विहीत कार्यपध्दतीनुसार तपासणी करण्यात यावी.

४) **पाकीटावरील मजकूर** :-EDNF आहार पुरवठा करणेसाठी वापरण्यात येणारी पाकिटे हे निविदेत नमुद Specification प्रमाणे तसेच Packaging and Labeling Act नुसार असणे बंधनकारक राहील. तथापि, निकषाप्रमाणे आढळून न आल्यास आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी आवश्यक ती दंडात्मक कार्यवाही करावी. EDNF आहार पुरवठ्याच्या पाकीटावर आवश्यक तपशिल नमूद असावा .

५) EDNF आहार खाण्यास अयोग्य असल्याचे प्रयोगशाळेच्या अहवालावरुन आढळल्यास तसेच कमी पाकिटे/कमी वजनाची पाकिटे प्राप्त झाल्यास आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना यांनी यासंदर्भात आवश्यक ती दंडात्मक कार्यवाही करावी.

६) उद्योग ऊर्जा व कामगार विभागाच्या दि. १.१२.२०१६ च्या शासन निर्णयातील खरेदी धोरणातील तरतुदीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

७) **पुरवठा आदेशाची कालमर्यादा** : निविदा अटी शर्तीनुसार सदर पुरवठा आदेशाची कालमर्यादा ३ वर्षासाठी राहील.

३. सदर एनर्जी डेन्स न्युट्रीशियस फुड (EDNF) आहाराचे सॅचेट अति तीव्र कुपोषित (SAM) बालकांना नियमित पोषण आहाराव्यतिरिक्त प्रतिदिन कमीत कमी एक व जास्तीत जास्त ३ याप्रमाणे देण्यात यावे. एनर्जी डेन्स न्युट्रीशियस फुड (EDNF) आहाराचा डोस हा वय, वजन व उंची विचारात घेऊन वैद्यकीय अधिकारी / कर्मचारी यांच्या सल्ल्यानुसार देण्यात यावा.

४. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना यांनी वरीलप्रमाणे तसेच निविदेतील अटी शर्तीची पुर्तता होत असल्याबाबतची खातरजमा करावी व याप्रकरणी पुढील आवश्यक ती कार्यवाही करण्यात यावी.

५. सदर प्रयोजनासाठी येणारा खर्च मागणी क्र.एक्स-१, २२३६ पोषण आहार, ०२ पोषक अन्न व पेये यांचे वितरण, १०१ विशेष पोषण आहार कार्यक्रम, (०९) अतितिव्र कुपोषित बालकांवर उपचार, (०९) (०१) ग्राम बाल विकास केंद्र कार्यक्रम, २२३६ १९९२, ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या तरतुदीमधून भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०७०५१४१६३४७८३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VILAS RAMDAS THAKUR

Digitally signed by VILAS RAMDAS THAKUR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=cb156fb408217396128e8dcaeed3f6fa70d9fd209eb9efc83bdd68b308614534, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C8B1E52C5C4F922AB6EB7A0B44101C838AEA34F29FBFF0AEBE9D85C3DE3468C2, cn=VILAS RAMDAS THAKUR
Date: 2024.07.16 10:26:46 +05'30'

**(वि. रा.ठाकूर)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत :-

१) मा. मंत्री, महिला व बाल विकास, मंत्रालय, मुंबई
२) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन, नवी मुंबई
३) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र मुंबई / नागपूर
४) सर्व जिल्हाधिकारी
५) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
६) सर्व विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास विभाग
७) सर्व जिल्हा कार्यक्रम अधिकारी (महिला व बाल विकास), जिल्हा परिषद
८) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१०) सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रामीण / आदिवासी / नागरी)
११) संबंधित पुरवठा संस्था (ए.बा.वि.से. यो. आयुक्तालयामार्फत)
१२) निवड नस्ती (कार्यासन ५), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई